नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील गावांनी नक्षलवाद्यांना गावबंदी केली आहे अशा गावांना विकासात्मक कामासाठी प्रोत्साहनात्मक म्हणून देण्यात येणा-या अनुदानात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक एनएएक्स ०४१८/प्र.क्र.१६९/विशा-१ब,**
**दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,**
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१ डिसेंबर, २०१८

वाचा : (१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापप्रो २००६/प्र.क्र.६१/का-१४, दि.२६.१२.२००६.
(२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एनएएक्स ११०९/प्र.क्र.६२९/विशा-१ब,दि.१८.०३.२०११

**प्रस्तावना :-**

नक्षलवादी चळवळीस आळा घालण्याच्या दृष्टीने नक्षलग्रस्त भागासाठी आदिवासी क्षेत्रातील गावामध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी ही योजना आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णय दि.२६.१२.२००६ अन्वये लागू करण्यात आली होती. त्याच धर्तीवर बिगर आदिवासी क्षेत्रातील गावामध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजना मंत्रीमंडळाच्या मान्यतेने संदर्भ क्र.२ शासन निर्णय, गृह विभाग, दि.१८.०३.२०११ अन्वये लागू करण्यात आली आहे.

२. या योजनेनुसार नक्षलग्रस्त भागातील बिगर आदिवासी क्षेत्रातील ज्या गावांनी पुढाकार घेवून नक्षलवाद्यांना गावबंदी केली आहे अशा गावांना प्रत्येकी रुपये ३ लक्ष एवढा निधी त्या गावाच्या विकासात्मक कामांसाठी प्रोत्साहानात्मक अनुदान म्हणून देण्यात येतो. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली डावी कडवी विचारसरणीबाबत राष्ट्रीय योजना व कृती आराखडा बाबत एकसूत्री कृती योजना (Unified command Mechanism) संरचेनेनुसार राज्यस्तरावरील गठीत समितीची बैठक दि.०१.०२.२०१८ रोजी झाली. या बैठकीमध्ये आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये तसेच बिगर आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजनेबाबतच्या प्रोत्साहनात्मक अनुदानामध्ये दुप्पट वाढ करण्याबाबत चर्चा झाली. त्यानुसार नक्षलग्रस्त भागातील बिगर आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजनेबाबतच्या प्रोत्साहनात्मक अनुदानामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नक्षलग्रस्त भागातील बिगर आदीवासी क्षेत्रातील ज्या गावांनी पुढाकार घेऊन नक्षलवाद्यांना गावबंदी केली आहे, अशा गावांना प्रत्येकी रुपये ३ लक्ष ऐवजी रुपये ६ लक्ष एवढा निधी त्या गावांच्या विकासात्मक कामासाठी प्रोत्साहनात्मक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे. सदर वाढ या आदेशाद्वारे सन २०१८-१९ या वर्षापासून लागू करण्यात येत आहे.

२. सदर निधी संबंधित गावाच्या ग्राम पंचायतीस संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत वितरीत करण्यात येईल. सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त राहील. जिल्हाधिका-यांनी सदर निधी संबंधित यंत्रणेला वितरीत करावयाचा आहे.

३. या योजनेनुसार नक्षलग्रस्त बिगर आदिवासी क्षेत्रातील ज्या गावांनी नक्षलवाद्यांना गावबंदी केली असेल ती गावे अनुदानास या योजनेंर्गत पात्र राहतील.

४. नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील गावांनी नक्षलवाद्यांना गावबंदी केली असेल त्या गावास मंजूर होणारा निधी त्या गावाने कशा प्रकारे खर्च करावायाचा या बाबतची मार्गदर्शक तत्वे सोबतच्या (परिशिष्ट अ) मध्ये दिलेली आहेत. त्या मार्गदर्शक तत्वास अनुसरुनच सदर निधी खर्च करण्यात यावा.

५. या योजनेकरिता मंजूर करण्यात येणारा निधी विहीत मुदतीत संपूर्णत: खर्च होईल, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी.

६. या योजनेसाठीचा आवश्यक खर्च नियोजन विभागाने जिल्हाधिकारी यांना ग्रामभेट योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून करावा. तसेच निधीची मागणी आवश्यकतेनुसार जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभागाकडे करावी.

७. या योजनेखाली मंजूर करण्यात येणारा निधी नियोजन विभागाच्या मागणी क्रमांक ओ-७,३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९० सचिवालय (०४) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल (०४)(०१) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृतिदल, ३१ सहायक अनुदाने (योजनाअंतर्गत) (वेतनेत्तर) संगणक सांकेतांक ३४५१०६५४ या लेखाशीर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५९/१८/ व्यय-७ दिनांक ११.०९.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेने व नियोजन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०५१२५४०२२८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Damodar Patil

Digitally signed by Vijay Damodar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay Damodar Patil
Date: 2018.12.05 12:57:43 +05'30'

सोबत:- परिशिष्ट -अ॰

(विजय पाटील)
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
४) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
७) जिल्हाधिकारी,गडचिरोली/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया/यवतमाळ/नांदेड

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,गडचिरोली/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया/यवतमाळ/नांदेड
९) पोलीस अधिक्षक, गडचिरोली/चंद्रपूर /भंडारा/गोंदिया/यवतमाळ/नांदेड
१०) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
११) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ /२,मुंबई/नागपूर
१२) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणकीय कक्ष नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय,मुंबई
१३) जिल्हा कोषागार अधिकारी,गडचिरोली/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया/यवतमाळ/नांदेड
१४) वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय,मुंबई
१५) कक्ष अधिकारी,नियोजन विभाग (का.१४१७), मंत्रालय,मुंबई
१६) निवड नस्ती (विशा-१ब)

परिशिष्ट अ
(शासन निर्णय क्रमांक एनएएक्स ०४१८/प्र.क्र. १६९/विशा-१ब
दिनांक ०१ डिसेंबर, २०१८ सोबतचे)

<u>नक्षलवाद्यांना गावबंदी केलेल्या गावांना मंजूर केलेला प्रोत्साहानात्मक निधी खर्च करण्याबाबत मार्गदर्शक सूचना</u>

ही योजना, नक्षलग्रस्त भागातील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील बिगर आदिवासी गावांसाठी लागू राहील. त्यासाठी संबंधित ग्रामपंचायत व ग्रामसभेने ठराव करणे आवश्यक राहील. तो ठराव त्यांनी पोलीस अधिक्षक, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व जिल्हाधिकारी यांना पाठविणे आवश्यक राहील.

२. गावबंदी योजनेच्या अंमलबजावणीबाबत जिल्हा पोलीस अधिक्षकांनी त्यांचा अहवाल आपल्या शिफारशीसह जिल्हाधिकारी यांचेमार्फत विभागीय आयुक्त, नागपूर यांना पाठविणे आवश्यक राहील.

३. ग्रामपंचायत व ग्रामसभेने ठराव व पोलीस अधिक्षक आणि जिल्हाधिकारी यांची शिफारस विचारात घेऊन मुख्य कार्यकारी अधिकारी अनुदान पात्र गावे निश्चित करतील व जिल्हाधिकारी यांना कळवतील. त्यानुसार जिल्हाधिकारी त्या गांवाना प्रत्येकी रुपये ६ लक्ष अनुदान एकाच हप्यात मंजूर करुन ते संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत संबंधित ग्रामपंचायतीस अदा करतील.

४. विकासात्मक कामे ग्रामपंचायतीमार्फत करुन घेण्यात येतील. त्यासाठी रुपये सहा लाखापेक्षा अधिक अनुदान दिले जाणार नाही.

५. विकासाची कामे व त्यांचे स्वरुप ग्रामसभेने निश्चित करावे. या विकासकामामध्ये लहान पाणीपुरवठा योजना, विहीर खणणे, अंगणवाडी खोली बांधकाम/दुरुस्ती, पिण्याच्या पाण्यासाठी पाईपलाईन टाकणे,पाणवठा तयार करणे, व्यायामशाळा बांधणे इ. कामाचा समावेश असावा.

६. या योजनेचे नियंत्रण संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी करतील. निधी अंशतः/ पुर्णतः अखर्चित राहिल्यास तो संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे परत करणे आवश्यक राहील.

७. या योजने अंतर्गत केलेल्या विकासात्मक कामाचा अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी प्राप्त करुन घेवून तो व निधी उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी यांच्यामार्फत विभागीय आयुक्त, नागपूर यांना सादर करतील. विभागीय आयुक्त, नागपूर अंतिम एकत्रित अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करतील.

*********************